**महाराष्ट्रात विपूल प्रमाणात घरबांधणी करण्यासाठी विश्वसनीय व उत्तम दर्जाचे बांधकाम करता यावे यासाठी बांधकाम तंत्रज्ञानाबाबत शासनास मार्गदर्शन करण्यासाठी तज्ञांची समिती गठित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**गृहनिर्माण विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः गृनिधो.२०१४/प्र.क्र.०३/गृनिधो-२**

मादाम कामा मार्ग,हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय,मुंबई-३२.

दिनांक ०६ ऑगस्ट,२०१५.

वाचा -

१) **शासन निर्णय क्रमांकःगृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग क्रमांक-एचएसजी-३३८४/६४/का.६,दिनांक १८ जून,१९८४ व ११ डिसेंबर,१९८४.**

२) **शासन निर्णय क्रमांकः गृहनिर्माण व विशेष सहाय्य विभाग क्र.एचएसजी-१०९८ / प्र.क्र.२१ / गृनिधो-१,दि.३०एप्रिल १९९८.**

३) **शासन निर्णय क्रमांकः गृहनिर्माण विभाग क्र.याचिका-१०२१/३४४/(भाग-२)गृनिधो-२, दिनांक २६ नोव्हेंबर,२००२.**

प्रस्तावना -

गृहनिर्माण विभाग, शासन निर्णय दि.२६ नोव्हेंबर २००२ अन्वये महाराष्ट्रात विपुल प्रमाणात घर बांधणी करण्यासाठी विश्वसनीय व उत्तम दर्जाचे बांधकाम करता यावे यासाठी पूर्वरचित बांधकाम तंत्रज्ञानाचा वापर करुन घरबांधणी करणाऱ्या कंत्राटदारांची यादी दर वर्षी तयार करण्याबाबतचे वेळापत्रक निश्चित करण्यात आले आहे. सदर शासन निर्णय हा गृहनिर्माण विभागाव्दारे मुंबई उच्च न्यायालयातील याचिका क्र.२३३१/२००१ मध्ये दिलेल्या आश्वासनानुसार व त्याची नोंद घेऊन निकाली काढलेल्या न्यायालयाच्या आदेशाच्या अनुषंगाने काढण्यात आलेला आहे.

२. पूर्वरचित बांधकाम साहित्य वापरुन घरबांधणी करण्यासाठी कंत्राटदारांची यादी तयार करण्याबाबतच्या(empanelment) शासनाच्या सदर निर्णयास बारा वर्षांहूनही अधिक कालावधी झाला आहे. दरम्यानच्या काळामध्ये बांधकाम क्षेत्रामध्ये नवनवीन तंत्रज्ञान विकसित झाले आहे. पूर्वरचित बांधकाम तंत्रज्ञानाव्यतिरिक्त इतर उपलब्ध तंत्रज्ञानांचा वापर करण्याकडे दुर्लक्ष करणे उचित होणार नाही.

३. निर्माण सामग्री व प्राद्योगिकी संवर्धन परिषद(BMTPC), नवी दिल्ली या संस्थेने बांधकाम तंत्रज्ञानाबाबत विविध आठ तंत्रज्ञानांची शिफारस केलेली आहे. या तंत्रज्ञानांचाही बांधकाम निर्मितीसाठी विचार करणे गरजेचे आहे. तसेच राज्य शासनाच्या गृहनिर्माण धोरण, २००७ मध्येही गृहनिर्माण तंत्रज्ञानाबाबत खालीलप्रमाणे तरतूद करण्यात आली आहे:-

- आधुनिक तंत्रज्ञानाचा वापर करुन कमीत कमी किंमतीत टिकाऊ घरे बांधणे
- पर्यावरण पोषक (इको हौसिंग) घरांची निर्मिती तसेच किमान मनुष्यबळ वापरुन आधुनिक तंत्रज्ञान आणि बांधकाम साहित्याची निर्मिती.
- गृहनिर्माण प्रकल्पाच्या बाबतीत बांधकाम गतीमान आणि किमान खर्चात होण्यासाठी प्रिकास्ट आणि प्रिफॅब्रिकेटेड इमारत साहित्याचा वापर करणे.

  नॅशनल बिल्डिंग कोड आणि भूकंप निरोधक बांधकाम विषयक मार्गदर्शक तत्वांची अंमलबजावणी करणे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्रात विपूल प्रमाणात घरबांधणी करण्यासाठी विश्वसनीय व उत्तम दर्जाचे बांधकाम करता यावे यासाठी बांधकाम क्षेत्रातील नवनवीन व सुयोग्य तंत्रज्ञान जे खर्च व बांधकाम कालावधीत बचत करु शकेल यासंबंधी शासनास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे समिती गठीत करण्यात येत आहे:-

| | | |
|---|---|---|
| १. | प्रधान सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय. | - अध्यक्ष |
| २. | सचिव (बांधकाम), सार्वजानिक बांधकाम विभाग, मंत्रालय. | - सदस्य |
| ३. | उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,मुंबई. | - सदस्य |
| ४. | प्रो.रवी सिंन्हा, स्थापत्य विभाग, आयआयटी, मुंबई. | - सदस्य |
| ५. | डॉ.प्रशांत भावे, विभागप्रमुख ,स्थापत्य विभाग, वीजेटीआय, मुंबई. | - सदस्य |
| ६. | मुख्य अभियंता, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, मुंबई | - सदस्य सचिव |

समिती आपल्या कामकाजात अन्य सुयोग्य व्यक्तीस आवश्यकतेनुसार समाविष्ट करु शकेल.

समितीने खालील मुद्दयांवर आपल्या शिफारशी पुढील २ महिन्यात शासनास सादर कराव्यात:-

१. राज्य शासनास असे तंत्रज्ञान जे भौगोलिक वातावरणाशी समरस,भूकंपरोधक, पर्यावरणदृष्टया शाश्वत आणि आर्थिकदृष्टया परवडणारे असतील अश्या बांधकामविषयक उपलब्ध तंत्रज्ञानाची मोठया गृहनिर्माण प्रकल्पांकरिता निवड करण्यासाठी मूल्यमापन करणे व सुयोग्य तंत्रज्ञान सुचविणे .

२. शिफारशीत केलेल्या संबंधित तंत्रज्ञानासाठी/ तंत्रज्ञानांसाठी आर्थिक व तांत्रिकदृष्टया सक्षम अशा एजंसीची सूची तयार करण्याचे निकष सूचविणे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०६१५४६१२६२०९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sarjerao Shankar Jagdale

Digitally signed by Sarjerao Shankar Jagdale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sarjerao Shankar Jagdale
Date: 2015.08.10 11:55:46 +05'30'

**स.शं.जगदाळे**

अवर सचिव,महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन,मलबार हिल,मुंबई.
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय,मुंबई-३२.
३) मा.मंत्री,(गृहनिर्माण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई-३२.
४) मा.राज्यमंत्री,(गृहनिर्माण), यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई-३२.
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन,मंत्रालय,मुंबई-३२.
६) प्रधान सचिव,गृहनिर्माण विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
७) सचिव (बांधकाम), सार्वजानिक बांधकाम विभाग, मंत्रालय,मुंबई-३२.
८) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी,महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण, वांद्रे,पूर्व,मुंबई-५१.
९) प्रो.रवी सिंन्हा, स्थापत्य विभाग, आयआयटी, मुंबई.
१०) डॉ.प्रशांत भावे, विभागप्रमुख ,स्थापत्य विभाग, वीजेटीआय,मुंबई.
११) मुख्य अभियंता, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण,वांद्रे,पूर्व, मुंबई.
१२) निवड नस्ती, कार्यासन - गृनिधो-२, गृहनिर्माण विभाग, मुंबई-३२.